सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारीतील जालना नगरपरिषदेच्या हद्दीतील रस्ते अवर्गीकृत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१७/प्र.क्र.४/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २९ मार्च, २०१७.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जा.क्र./ मुअऔ/का-१४/रस्ते हस्तांतरण, दिनांक २३/०१/२०१७.
२) मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा.क्र./ मुअऔ/का-१४/रस्ते हस्तांतरण ,दिनांक ०८/०३/२०१७.

प्रस्तावना :-

जालना जिल्ह्यातील जालना शहरामधून जाणा-या रस्त्यांना बाह्यवळण रस्ता तयार झाला आहे. सदर बाह्यवळण रस्त्यावरुन वाहतूक सुरळीतपणे होत असल्याने सदर रस्त्यांची जालना नगरपरिषद हद्दीतील लांबी अवर्गीकृत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तसेच याबाबत मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचेकडून प्रस्ताव प्राप्त झाला आहे. सदर रस्त्याच्या देखभाल - दुरुस्तीचा खर्च जालना नगरपरिषदेकडून करण्यात येईल असा ठराव क्र.४२, दिनांक १४/१०/२०१६ रोजी पारित करण्यात आला आहे.

शासन निर्णय :-

मुख्य अभियता, सा.बां.प्रा.विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व त्याअनुषंगाने प्राप्त झालेला अहवाल, तसेच संदर्भाधीन शासन निर्णयातील टिप ५ मधील तरतूद विचारात घेऊन, जालना जिल्ह्यातील जालना नगरपरिषद हद्दीतील खालीलप्रमाणे चार रस्त्यांची लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रस्त्यांची नावे | अवर्गीकृत करवयाचा रस्ता | साखळी क्रमांक | रस्त्याची लांबी |
|---|---|---|---|---|
| १ | मलकापूर -जालना- वडीगोद्री रस्ता (प्र.रा.मा. १३) | उड्डाणपूल रेल्वे गेट ते अंबड चौफुली पर्यंत | १५४/०० ते १५५/०० | १ कि.मी. |
| २ | औरंगाबाद- जालना - वर्धा रस्ता (प्र.रा.मा. १२) | जिजामाता प्रवेशद्वार ते सिंदखेडराजा चौफुली पर्यंत | ०/०० ते १/२० | १.२० कि.मी. |
| ३ | भोकरदन-जालना- परतूर रस्ता (रा.मा. २२३) | भोकरदन चौफुली (हनुमान मंदिर) ते अग्रसेन चौक रस्ता | ४९/००ते ५१/०० | २.०० कि.मी. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | जालना शहरातील प्रजिमा - ३९ अंतर्गत | १) मंठा चौफुली- गुरूबच्चन चौक-जिजामाता प्रवेशद्वार- कन्हैयानगर चौक | ०/०० ते ३/६० | ३.६० कि.मी. |
| | | २) कृषिउत्पन्न बाजार समिती मोंढा - बालाजी चौक- अग्रसेन चौक (भोकरदन नाका) | ३/६० ते ५/६० | २.०० कि.मी. |
| | | ३) भोकरदन नाका ते विशाल कॉर्नर | ५/६० ते ७/६० | २.०० कि.मी. |
| | | ४) बाबुराव काळे चौक ते अंबडनाका रेल्वे गेट | ७ ६०/ते १२/४० | ४.८० कि.मी. |

सदर रस्ते अवर्गीकृत केल्यानंतर जिल्ह्यातील रस्त्यांच्या लांबींमध्ये पुढील प्रमाणे बदल होतील.

| **रस्त्याचा प्रकार** | **रवियो- २००१-२१ नुसार एकूण लांबी (कि.मी.)** | **अवर्गीकृत करावयाची लांबी (कि.मी.)** | **अवर्गीकृत केल्यानंतरची लांबी (कि.मी.)** |
|---|---|---|---|
| प्र.रा.मा. | १९८.७० | २.२० | १९६.५० |
| रा.म. | ९७२.८५ | २.०० | ९७०.८५ |
| प्र.जि.मा. | १०५५.७० | १२.४० | १०४३.३० |

अशी एकूण **१६.६० कि.मी.** लांबी अवर्गीकृत करण्यात येत आहे. तसेच सदर रस्त्यांच्या देखभाल-दुरुस्तीचा खर्च जालना नगरपरिषदेकडून करण्यात येईल व अवर्गीकृत केलेल्या रस्त्यांवर होणाऱ्या देखभाल-दुरूस्ती करिता शासनामार्फत कोणतेही अतिरिक्त अनुदान देण्यात येणार नाही. तसेच मुख्याधिकारी, नगरपरिषद यांचेकडून देण्यात आलेल्या प्रतिज्ञापत्रामध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून सदर जालना नगरपरिषद हद्दीतील शहरातून जाणाऱ्या राज्यमार्गांना अवर्गीकृत करण्यास शासन मान्यता देत आहे.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०३२९१४५५४८९६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.03.29 14:58:25 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

४) जिल्हाधिकारी, जालना.

५) मुख्याधिकारी, नगरपरिषद जालना.

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना.

७) कार्यकारी अभियंता, (सा.बां.) जिल्हा परिषद, जालना.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.